**शिर्डी विमानतळ प्रकल्पामुळे बाधित झालेल्या प्रकल्पग्रस्तांना पर्यायी भूखंड वाटप करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः मविवि १२१४/प्र.क्र.१५२/२८-अ**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
तारीख: ०७/०८/२०१५

वाचा -

१) जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी पत्र क्र. कार्या २६/३९६/२०१३, दि. २२/११/२०१३ द्वारे सादर केलेला प्रस्ताव.

२) शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग क्र. जमीन ०९/२०१२/प्र.क्र. ७९/ज-१, दि. ३०/११/२०१२

३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. जमीन -२०१५/प्र.क्र. ४५/ज-१, दि. ०१/०६/२०१५

प्रस्तावना -

अहमदनगर जिल्ह्यातील शिर्डी संस्थानानजीक मौजे काकडी, तालुका कोपरगाव येथे राज्य शासन नवीन ग्रीनफील्ड विमानतळाची निर्मिती करीत असुन या विमानतळाचा विकास महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीमार्फत करण्यात येत आहे. या प्रकल्पासाठी मौजे काकडी येथील शेतकऱ्यांच्या शेतजमिनी संपादित करण्यात आल्या असुन १३ प्रकल्पग्रस्त बेघर व भूमिहीन होणार आहेत. त्यामुळे या १३ प्रकल्पग्रस्तांना पुनर्वसनांतर्गत निवासी भूखंड देण्याचे आदेश राज्य पुनर्वसन प्राधिकरणाने दिले आहेत. राज्य पुनर्वसन प्राधिकरणाने संमत केलेल्या पुनर्वसन योजनेनुसार संबंधित १३ प्रकल्पग्रस्तांना निवासी भूखंडांचे वाटप करण्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे;

**शासन निर्णय-**

संदर्भ क्र. १ येथील प्रस्तावात नमूद १३ प्रकल्पग्रस्तांना पुनर्वसनांतर्गत निवासी भूखंडांचे वाटप करण्यासाठी मौजा काकडी, तालुका कोपरगाव, जिल्हा अहमदनगर येथील गट क्र. २/१, एकूण क्षेत्र ९.३६ हेक्टरपैकी ५४१०.०० चौ. मी. जमिनीचा वापर करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर मान्यता खाली नमूद अटी /शर्तीच्या अधिनतेने करण्यात येत आहे;

१) जिल्हाधिकारी, अहमदनगर यांनी निवासी भूखंडांचे वाटप परस्पर संबंधित प्रकल्पग्रस्तांच्या नावे करुन भाडेपट्टाकरारही संबंधित प्रकल्पग्रस्तांशी करावा.

२) या शासकीय जमीनीकरीता शासनजमा करावयाची सन २०१५ च्या शिघ्रसिध्दगणकदरानुसार निश्चित होणारी कब्जेहक्काची रक्कम महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनीने त्यांना भूसंपादनाकरीता प्रदान केलेल्या अनुदानातुन जिल्हाधिकारी, अहमदनगर यांच्याकडे भरणा करावी.

३) या मान्यतेनुसार तसेच संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन परिपत्रक / निर्णयातील तरतूदींनुसार गट क्र. २/१, एकूण क्षेत्र ९.३६ हेक्टरपैकी ५४१०.०० चौ. मी. शासकीय जमिनीचा आगाऊ ताबा जिल्हा पुनर्वसन अधिकारी, अहमदनगर यांना प्रदान करण्याबाबत आदेश निर्गमित करुन जिल्हा पुनर्वसन अधिकारी, अहमदनगर यांचेमार्फत संबंधित १३ प्रकल्पग्रस्तांना निवासी भूखंडांचे वाटप तातडीने पूर्ण करावे. सदर आदेश महसूल व वन विभागाने अनौ. संदर्भ क्र. युओआर-९/२०१४/ज-६, दि. १२/०६/२०१५अन्वये दिलेल्या अभिप्रायांनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०७१६३७१८९००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAMEER ANANT SAWANT

Digitally signed by SAMEER ANANT SAWANT
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=SAMEER ANANT SAWANT
Date: 2015.08.10 12:21:05 +05'30'

**(समीर सावंत)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत,**

१. विभागीय आयुक्त, नाशिक विभाग, नाशिक
२. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र विमानतळ विकास कंपनी
३. जिल्हाधिकारी, अहमदनगर, अहमदनगर
४. जिल्हा पुनर्वसन अधिकारी, अहमदनगर
५. उपसंचालक, विमानचालन संचालनालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा) महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
७. अधिधान व लेखाधिकारी, मुंबई
८. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर
९. कार्यासन अधिकारी, कार्यासन ज-६, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती, कार्यासन २८-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई